# अतिप्राचीन
# वैदिक वाङ्मय
# आणि
# तत्कालीन जीवनादर्श

बारामतींत माझ्या बालपणीं मायभटे हें उपनाम असलेलें एक गृहस्थ मला लाभले. त्यांच्याकडे संध्या शिकत असतांना त्यांचा वैदिक वाङ्मयाचा व्यासंग किती यथासांग आणि परिपूर्ण आहे, याची त्यावेळीं अंधुकशी कल्पना आली होती. पौरोहित्य हा जरी त्यांचा व्यवसाय होता तरी वैदिक वाङ्मयांत खरे रमलेलें असे ते व्यक्तित्त्व होतें. पौरोहित्याच्या वेळीं त्यांत समाविष्ट असणाऱ्या अनेक ऋचा म्हणत असतांना ते डोळे मिटून त्यांत रंगून जात आणि त्या ऋच्या संपल्यावर पौराणिक मंत्रानें समोरच्याला ते ते विधी सांगत असत. असा पुरोहित नंतरच्या काळांत माझ्यातरी नजरेंत आला नाही. त्यांचें वागणें, बोलणें, ऋचा म्हणत असतांना त्यांचा मऊमुलायम आवाज, हे सगळे अनुभविताना वाटायचे “ मधुराधिपते: अखिलं मधुरम्। ” त्यांच्या न कळत झालेल्या या ऋणासंबंधीं म्हणावे वाटते, “ मदङ्गे जीर्णतां यातु ”

ते आमच्याच शाखेचे देशस्थ ऋग्वेदी होते. वेदवाङ्मयांतील चमत्कृतीपूर्ण विकृतीमुळें आणि

त्यांचेमुळेंच माझें ऋग्वेदाकडे लक्ष वेधलें गेलें. पद, क्रम, जटा, घन यासह ऋचेचा पाठ कसा असतो, याविषयीं ते खूप बोलत आणि कांहीं म्हणूनहि दाखवत. त्यावेळीं माझें वय ११ वर्षांपेक्षां जास्त नव्हतें. त्यामुळें हें सगळे समजण्याएवढी बुद्धीची प्रगल्भता अर्थातच त्यावेळीं नव्हती. मात्र तेव्हांपासून वेदवाङ्मयाविषयीं अतिशय आवड निर्माण झाली. माझें बाल-मानस त्या कल्पना सृष्टींत कित्येक दिवस रमून गेलें होतें.‘‘ तत् चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् । भावस्थिराणि जननान्तर संहृदानि ।। ’’ अशासारखी त्यावेळीं अवस्था होती. नंतर कितीतरी वर्षांनी, प्रौढ वयांत, कॉलेजमध्यें असतांना मेघदूत, कुमारसंभव, रघुवंश, शाकुन्तल तसेच छान्दोग्य आणि बृहदारण्यकांतील कितीतरी प्रकरणें अभ्यासाला होतीं. या सगळ्यामुळें संस्कृतचें वैभवसंपन्न भांडारच माझ्यापुढे खुले झालें. खूप रमलो मी त्यांत! त्यावेळीं प्रथमत: एक कुतुहल म्हणून ‘‘वैदिक संशोधन मंडळ’’ या संस्थेंत जात असे. नंतर बालपणांतील आठवणी जागृत होऊं लागल्या. संस्थेच्या दगडी इमारतीच्या दर्शनी अंगाला कोरलेली ती ऋचा मला फार आवडूं लागली, कां कोणास ठाऊक!

उद् वयस् तमसस् परि: ज्योति पश्यन्त उत्तरम्।
. .देवं देवत्रा सूर्य अगन्म ज्योतिरूत्तमम्।।

बालपणांतील मनाची ती अवस्था पुन्हां उफाळून आली आणि त्यापुढे अभिजात संस्कृत वाङ्मयहि फिके वाटूं लागले. वेदवाङ्मयांतील भावविश्व अद्भूत, अतिशय प्रामाणिक ***Authentic*** आणि कमालीचे लोभस आहे. त्यावेळचा एक श्लोक मला आठवतो,

दोअंगीं ऋतसत्य या विनटली जी नित्य आद्याकला
जी वर्णध्वनिरूप ह्या प्रगटवी सत्यांत नाना कळा
ध्यानावस्थित सन्मनीं स्फुरत जी मन्त्रार्थरूपा श्रुति
ती श्रेयप्रिय मंगलास वितरो वाग्वैदिकी भारती

मात्र यापूर्वी, माझ्या बालपणांत आणि ऐन तारूण्यांत बारामतीनें मला सगळ्या क्षेत्रांतील अमाप सुसंस्कार दिले. काव्य, नाटय, संगीत, कथा, कीर्तनें, प्रवचनें, व्याख्यानें आदि गोष्टींना त्याकाळीं बारामतींत जणूं उधाण आलें होतें. मोठमोठे कीर्तनकार, व्याख्यातें बारामतींत महिना-महिना मुक्काम करून असत. मला ती अपूर्व पर्वणी वाटत असे. या कला आणि विद्या व्यासंगाच्या प्रान्तांतील एकहि प्रसंग मी चुकवीत नसे. त्यावेळीं कसली धावपळ होती माझी! माझें भाग्य असे कीं, वडिलांनी माझ्या या उपक्रमांना फार उत्तेजन दिलें. त्यांनी मला कधीहि अडविले

नाही. पुष्कळशा कार्यक्रमांना रात्रीं ९ वाजतां जावे लागे. परत आल्यावर बारा अथवा एक वाजतांहि ते स्वता उठून दरवाजा उघडत असत. यामुळेंच पहाटे ४।। ला उठून शालेय अभ्यासांतहि उणीव राहूं देत नसे. वडील हें सर्व पाहत असत. कांहींहि बोलत नसत. मात्र एकूण ते माझ्यावर संतुष्ट होते हे नक्की. शालेय अभ्यास तर माझा जीव कीं, प्राण होता. देवपूजेसारखी त्यावर माझी निष्ठा होती. जीवनांतील अनेकविध विषय, पण कशाकडेच माझे दुर्लक्ष होत नव्हतें. त्या सर्वांचें जणूं तौलनिक अध्ययन चाललें होतें. अरविंद म्हणतात ना, ***All life is yoga.*** या सगळ्या गोष्टी माझ्या स्वाभावगतच आहेत. इयत्ता ७वीच्या दिवाळीच्या सुट्टींत टिळकांचें गीतारहस्य १५ दिवसांत वाचून काढलें होतें. ज्या गृहस्थाकडे तो ग्रंथ होता ते माझ्या वडिलांचे मित्र होते. मी लहान असल्यामुळें त्यांनी तो मजजवळ दिला नाही. त्यांच्या घरीं त्यांनी खुर्ची टेबल ठेऊन माझ्या वाचनाची उत्तम व्यवस्था केली होती. जेवण झालें कीं, दुपारी १२ पासून ६ वाजेपर्यन्त मी वाचीत बसत असे. पहिल्या दिवशीं कां कोणास ठाऊक त्यांना फार आश्चर्य वाटलें. आणि दुसऱ्या दिवसापासून पुढे १४/१५ दिवस रोज ४ वाजतां माडीवर ते मला चहा आणून देत होते. मला हें फार अवघडल्यासारखे वाटें. दादा,कशाला हा त्रास घेता तुम्ही? असे म्हटल्यावर ते म्हणत,“ अरे हे फार पुण्याईचें काम आहें.

कित्येक दिवस हा ग्रंथ पडून होता. तूं माझ्या घरीं देव आलास!'' त्यावेळीं १८ वा अध्याय मी संपूर्ण लिहून काढला होता. पुढील काळांत मी गीतारहस्याचा सखोल अभ्यास केला. तो ग्रंथ ४/५ वेळां तर पुन्हःपुन्हा संपूर्ण वाचून काढला. महाराष्ट्रांत त्यावरील टीका प्रतिटीकांचें जे तुंबळ युद्ध ३० वर्षें गाजलें तें सगळें वाङ्मय बारकाईनें अभ्यासलें. मात्र, कधीहि, आजहि गीतारहस्य हातांत घेतलें कीं, त्या वयस्कर गृहस्थांची, दादांची आठवण येते आणि डोळे भरून येतात. बारामतींतील कितीतरी असे प्रसंग असलेलें तें वातावरण आठवलें आणि सर्वांच्या ऋणांचें स्मरण झालें म्हणजे वाटतें,'स पर्यापर्यायः तवभवतु यन्मे विलसितम्।'

ऋचेच्या पाठाविषयीं मागे उल्लेख केला; त्यासंबंधी कांहीं गोष्टी विशद करणें अत्यावश्यक आहे. वैदिक —यांत याज्ञिक, पुरोहित हे सगळे शब्द समानार्थी समजावेत— वेदांना शब्दप्रधान मानतात. तें मन्त्रवाङ्मय आहे अशी त्यांची अचल श्रद्धा आहे. वैदिक वाङ्मयाची भाषा आर्ष आहे आणि नंतर पुढील कालखण्डांत अभिजात संस्कृत भाषा निर्माण झाली; हा सार्वत्रिक समज, त्याचप्रमाणे यासंबंधीं युरोपीय अथवा एतद्देशीय पंडितांची मतें पाखडून फुंकून घ्यावी लागतील. सरळ सरळ स्वीकारता येणार नाहीत. शब्दांमध्यें उत्पादक सामर्थ्य आहे अशी वैदिकांची धारणा असल्यामुळें मन्त्र, स्वर आणि छन्द

इत्यादींनी नियमित असणारी ती विशिष्ठ भाषा आहे. ती आर्ष नव्हें हे आवर्जून सांगणें भाग आहे. प्राचीन काळापासून अगदी गुप्तकालखंडापर्यन्त म्हणजे कालिदास, भवभूति, माघ, भारवीपर्यन्त संस्कृत भाषा ही एकच आहे. सिद्धान्तकौमुदीकार पाणिनीनें असा फरक केला नाही. वैदिक भाषेचें स्वरूप नीट न समजल्यामुळें मॅक्समूलर, डयूसन, विंटरनिट्झ इत्यादि युरोपीय पंडितांचा चुकीचा समज झाला आहे. वेदवाङ्मयाची भाषा ही विशिष्ठ भाषा आहे. कांहीं विशिष्ठ धोरणानें हेतुपुर:सर त्या भाषेचें स्वरूप तसे ठेवलें आहे. इतर अफाट संस्कृत वाङ्मयापेक्षां वेदाची ही अनन्यसाधारण विशेषता आहे.

यासाठीं वैदिकांचेकडून सहजस्वाभाविकपणें जे मार्ग अनुसरलें गेलें आहेत,त्यांत दिसून येणारी त्यांची बुद्धिमत्ता मन थक्क करणारी आहे. उदाहरणार्थ उदात्त अनुदात्त स्वर योजना, आघात अथवा झटका यांतील मर्म इत्यादि बऱ्याच गोष्टी आहेत. मला वाटते यामुळेंच वैदिक वाङ्मयांत कोणताहि पाठभेद न होता आसेतु हिमाचल, २० हजार वर्षेंपर्यन्त त्याचें जसेच्या तसे रक्षण झालें आहें. त्याची मौखिक परंपराहि अविच्छिन्न चालत आलेली आहे. जरी यास्कांनी ‘भेकाइव रटन्ति’ म्हणजे बेडकासारखे डराव डराव करतात म्हणून त्यांची टवाळी केली असली तरी वैदिकांचे भारतवर्षावर अपरंपार उपकार आहेत. त्यांचेंमुळेंच वैदिक वाङ्मयाचें आजपावेतों शुद्ध

स्वरूपांत रक्षण झालें. नाहींतर त्याचा केव्हांच लोप झाला असता. अथवा, त्यांत पाठभेद अथवा अपपाठ शिरून इतर ग्रंथाप्रमाणे वेदांचा चुथडा झाला असता. आणि इतक्या प्राचीन वाङ्मयाचें पाठसंशोधन करणें दुरापास्त झालें असतें. या भारतवर्षाला वैदिकांच्या ऋणांतून कधीहि मुक्त होता येणार नाही. तें सदैव शिरीं धरावे इतके त्याचें मोल आहें. यासाठीं वैदिकांच्याकडे सहानुभूतीनें, जिव्हाळ्यानें, आत्मीयतेनें पाहण्यास हवे आहे. त्यांच्या कष्टाचें, दक्षतेचें, बुद्धिमत्तेचें महत्त्व ओळखण्यास हवे आहे. तसेच पिढ्यान्पिढ्या त्यांनी हा वारसा सांभाळला, जतन केला त्याचें आर्थिक दृष्ट्या चीज करणे व्यावहारिक भूमिकेवर अत्त्यावश्यक आहे. वेदश्रवण करणाऱ्यांची आणि त्यासाठीं विपुल द्रव्य खर्च करणाऱ्यांचीहि परंपरा या देशांत फार प्राचीन काळापासून होती. टाळी कधी एका हाताने वाजत नाही, त्यासाठीं दोन्ही हात लागतात. वैदिकांचें वेदांच्या अर्थाकडे लक्ष नव्हतें किंवा त्यांचें त्यांना आकलन झाले नाही अशी टोकाची वक्तव्यें करूं नयेत. एकादा माणूस एकाद्या विशिष्ठ विषयांत ***P.h.d.*** मिळवितो म्हणजे जीवनाच्या इतर ज्ञान प्रांतात तो शंख असतो हें म्हणणें जसे चूक ठरते तशीच चूक आम्ही वैदिकांच्या बाबतींतहि करतो. वैदिकांनी एक विशिष्ठ जीवन कार्य आयुष्यभर स्वीकारलें, एकाच ज्ञान

शाखेवर त्यांनी सर्व लक्ष आणि सर्व शक्ति केंद्रित केली तर त्यांना दोष देणे उचित ठरेल कां, हाहि विचार करण्यासारखा विषय आहे. यास्क जरी लांब जिभा काढून बोलत असले तरी सगळ्याच ऋचांचा निसर्गवर्णनपर अर्थ करणें कितपत योग्य आहे हाहि एक विवाद्य वादविषय आहे. यामुळें यास्कांनाहि प्रमाण मानता येत नाहीं. वेदवाङ्मयावर सायणाचार्यांचें एकांगी भाष्य आणि मनुष्याचे पूर्वज रानटी होते, हा विकास अथवा उत्क्रान्ती वादाचा सिद्धांत ***Theory of evolution*** यामुळें वेदवाङ्मयाचें अध्ययन कांहीं बाबतींत अपूर्ण आणि पुष्कळ बाबतींत विकृत झालें आहें. ऋचात्मक वैदिक वाङ्मय निर्माण झाल्यावर नंतर त्याला छन्द आणि स्वर लागले; असा दृढमूल गैरसमज शेकडों वर्षांपासून सार्वत्रिक होऊन राहिला आहे. यामुळेंच वैदिकांची प्राचीन परंपरा हा विनाकारण संशोधनाचा विषय झाला आहे. माझ्या मतें वैदिक ऋच्यांच्या काळांतच त्याला छन्द व स्वर लागले. दुसऱ्या शब्दांत छन्दस्वराशिवाय ऋच्यांची निर्मितीच होऊं शकत नाही. छन्दस्वर ही ऋचेची अविभाज्य अंगे आहेत. वैदिक ऋच्यांची अतिप्राचीन निर्मिती आणि वैदिकांची प्राचीन परंपरा या दोन वेगळ्या गोष्टी नाहीत. एकाच कालखंडातील एकाच नाण्याच्या ह्या दोन बाजू आहेत. वैदिकांच्या परंपरेचा शोध घेणे हा वेडगळ आणि बालिश उद्यम वाटतो.

इसवी सनाच्या १७व्या शतकापासून युरोपचें प्राच्य विद्येकडे लक्ष वेधलें गेलें. यांत फ्रान्स आणि जर्मनी ही राष्ट्रें प्रामुख्यानें येतात. अभिजात वाङ्मया-विषयीं फ्रान्सची ख्याती सर्वदूर आहे. मात्र, प्राच्य-विद्येच्या अध्ययन व अध्यापनांत जर्मनीनें फार मोठी आघाडी घेतली. आणि ही घटना जगाला कळण्यास मुख्य कारण म्हणजे जर्मन पंडित हेच होते.उदाहरणार्थ मॅक्समूलर आणि डयूसन {डयूसनला एक ***Insight*** अंतर्दृष्टि होती.} या जर्मन पंडितांनी इंग्रजी भाषेचा चांगला अभ्यास करून जर्मन ग्रंथांची इंग्रजींत भाषांतरें (अनुवाद) करण्याचा उद्योग सुरूं केला. इतकेच नव्हें तर या पंडितांच्या अफाट विद्या-व्यासंगातून प्राप्त झालेल्या प्रगल्भ बुद्धीमुळें पूर्वेकडील तत्त्वज्ञान या ज्ञानशाखेवरील कांहीं स्वतंत्र ग्रंथांचीहि निर्मिती झाली. उदाहरणच द्यायचें झाल्यास ***Maxmuller*** यांचा ***Six system of Indian philosophy.*** हा ग्रंथ पहा. षड्दर्शनावरील त्यांचा हा ग्रंथ फार लोकप्रिय झाला.‘‘द्वौ योगौ, द्वे च मीमांसे, द्वौ तर्कौ इति षट् बुधाः।’’ कपिल सांख्य आणि पातंजल हे दोन योग, पूर्व आणि उत्तर या दोन मीमांसा म्हणजे जैमिनीची धर्मसूत्रें आणि बादरायण व्यासांची ब्रह्मसूत्रें, याशिवाय गौतमप्रणीत न्याय आणि कणादाचें वैशेषिक ही दोन तर्कशास्त्रें असा मॅक्समूलरच्या

ग्रंथाचा विस्तृत व्याप आहे. मॅक्समूलर हा संस्कृत भाषेवर प्रभुत्त्व असलेला विद्वान पंडित होता.

अशा प्रकारे १७ व्या शतकांत युरोपमध्यें प्राच्य विद्या अध्ययनाची एक प्रचंड लाट उसळली. यांत जर्मनी आणि फ्रान्समध्यें तर अनेक विद्यापीठांतून याच विद्येच्या निरनिराळ्या ज्ञानशाखांच्या अध्ययन व अध्यापनाला असा कांहीं बहर आला कीं, ते पाहून भारतवर्षानेंहि आपले डोळे विस्फारले. आणि याचाच परिणाम म्हणून येथे युरोपीय पंडितांची मुक्तकंठाने स्तुती सुरूं झाली. हें एक उदाहरण पहा, हजारीप्रसाद द्विवेदी म्हणतात,

" कैसी कैसी कठिनाइयोंको झेलकर सर विल्यम जोन्सने संस्कृत सीखी। कितनी लज्जा, कितने दु:ख, कितने परितापकी बात है, कि विदेशी लोग यहाँ आते; न जाने कितना कष्ट उठाकर यहाँकी भाषायें सीखते। लेकिन हम? हम कुछ नही करते। करते है सिर्फ व्यर्थ कालातिपात, और अंग्रेजी सीखनेकी अपनी योग्यताका व्यर्थ प्रदर्शन। घरमें घोर अंधकार है, उसे तो नही देखते लेकिन विदेश, जहाँ बिजलीकी रोशनी है, वहाँ चिराग जलाने दौडते हैं।

युरोपीय पंडितांना संस्कृत भाषेच्या अध्ययनाच्या श्रीगणेशालाच पाणिनीची अष्टाध्यायी अत्यावश्यक झाली. या ग्रंथाच्या अध्ययनाला सुरवात केल्यानंतर युरोपीय पंडित एवढे मंत्रमुग्ध झाले कीं,जणूं त्यांना सुवर्ण भांडारच सापडावे अशी त्यांची अवस्था

झाली. भाषेच्या व्याकरणावरील सर्वोत्तम ग्रंथ असे ते नि:शंकपणें म्हणूं लागले.

ज्याला इंग्रजींत ***Grammer*** म्हणतात तें फार पूर्वकाळींच युरोपला ग्रीक आणि रोमन लोकापासून चांगले अवगत होते. मात्र पाणिनीची अष्टाध्यायी त्यांना अभूतपूर्व चमत्कार वाटला. संस्कृत भाषेचें प्राचीनत्व आणि विशेषेकरून प्रकृति, प्रत्यय वगैरे मूळ शब्दापासून किंवा धातूपासून भिन्न करून त्यांच्या पासून साधित शब्द कसे तयार करावे याबद्दल भाषेंतील सर्व शब्दांना लागू पडणारे नियम व अपवाद यांचा पाणिनीच्या ग्रन्थांत जो समावेश केलेला आहे त्याने तर पाश्चात्य भाषा विद्वानांच्या उद्योगास एक प्रकारचें नवेच वळण लागलें. निरनिराळ्या भाषांचें तुलनात्मक भाषाशास्त्र म्हणून जर्मन पंडितांनी एक नवीनच शास्त्र निर्माण केलें आणि हें शास्त्र पूर्णतेस आणण्यास बॉप, बर्नाफ, कोलरिज, जोन्स वगैरे पंडितांनी अतिशय परिश्रम केले. त्याची मूळ प्रेरणा पाणिनीचा हा ग्रंथच होता. नंतरच्या कालखंणांत रॉथ, बोथलिंग, डार्मेस्टर, वेबर, बुल्हर यानंतरच्या पुढील काळांत लडविक, ग्रासमन, व्हिटने इत्यादि विद्वानांची परंपरा जर्मनी आणि फ्रान्समध्यें निर्माण झाली. त्यांनी प्राच्य भाषा, प्राच्य धर्म आणि सर्व भाषांची तुलना, यावर अनेक ग्रंथ लिहून ठेवले आहेत. युरोपमध्यें ऋग्वेदाचें आणि त्यावरील सायणाचार्यांयाच्या भाष्याचें पहिले प्रकाशन

मॅक्समूलरने केले. किती विशेष आहे हा! या लोकांची खरोखरच कमाल आहे. संपूर्ण विदेशी असूनहि संस्कृत भाषेवर या विद्वानांचें केव्हढे प्रभुत्व होते. ऋग्वेद भाष्याच्या प्रकाशनानें तर मॅक्समूलरची कीर्ति दिगंत पसरली. जगांतील सगळ्या विद्यापीठांत त्याला फार मान होता. विवेकानन्द आणि मॅक्समूलर तर अगदी जिव्हाळ्याचें मित्र होते.‘‘स्वदेशें पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते।’’ हेंच खरे.

वैदिक भाषेचा विशेष असा कीं, तिला स्वर आहेत तसे संस्कृत भाषेला नाहीत. या स्वरासंबंधीं जर्मन पंडितांनी अतिशय विचार केला आहे. वैदिक व्याकरणाचें, स्वरांचें, भाषेच्या तुलनात्मक अभ्यासाचें एकंदर स्वरूप फारच विशाल व गहन आहें. युरोपीय पंडितांचें त्यावरील परिश्रम कमालीचे थक्क करणारे आहेत. यांतील एकेका अंगाचा त्यांनी वर्षानुवर्षे विचार केलेला आहे. सायव्हर्स, एगलिंग असे कितीतरी पंडित आहेत. त्यांचा व्यासंग व परिश्रम अफाट आहेत. मात्र इतके सर्व असूनहि दुर्दैव असे कीं, त्यांचें सगळें मुसळ केरांत गेले आहे. रामायणांत एक उल्लेख आहे,‘‘मारिचश्च सुबाहुश्च वीर्यवंतौ सुशिक्षितौ हे दोघे राक्षस असूनहि विद्यासंपन्न होते. असे असेल तर त्यांना राक्षस कां म्हटले आहे याचें कारण त्यांची वासना शुद्ध नव्हती हेच होय. अफाट विद्याव्यासंग आणि कमालीचें परिश्रम करणाऱ्या बहुसंख्य युरोपीय पंडितांचा उपजत पिंडच मलीन

वासनेचा असल्यामुळें त्यांनी भारताविषयीं सदोदित कपट कारस्थानें केली आहेत. एवढे परिश्रम घेऊनहि ते निष्कर्ष चुकीचे  काढतात आणि मलीन व हीन वासनेमुळें स्वताचा विद्याव्यासंग व्यर्थ घालवतात, बुद्धीचे मातेरे करून घेतात. ही बौद्धिक दिवाळखोरी आहे, हा बौद्धिक अध:पात आहे. दुसऱ्याला कमी लेखून स्वताचे मोठेपण सिद्ध होत नाही. हे या युरोपीय पंडितांना कधी कळणार आहे हें देवच जाणे! आम्ही निष्कर्ष योग्य तेच काढूं कारण आम्ही याच संस्कृतींत वाढलो आहोत. आमच्या येथें सभ्यता एकंदर कमीच आहे. अगदी गावंढळपणाचा भास व्हावा इतपत ती कांहींवेळां दिसून पडते. मात्र येथील संस्कृतीचें मूलस्वरूप जगांतील इतर देशांच्या मानाने केव्हांहि उज्वलच आहे. नोकदार ख्रिस्ती युरोपीय राष्ट्रांत सभ्यता हा संस्कृतीला पर्यायी शब्द मानला जातो. *Table manners* अथवा *Manners aticates* यामध्यें वेळप्रसंगीं हीन वासना आणि कुटिल कारस्थानें उजळ माथ्यानें बसूं शकतात. युरोपीय समाजाचें जीवन कमालीचे समृद्ध आणि प्रगत असूनहि त्याच्या या काळ्या बाजूमुळें भारताच्या दृष्टीने तो बदनाम पावला आहे.

हे युरोपीय पंडित स्वर आणि ***accent*** एकच समजतात. यामुळें ग्रीक व लॅटीन भाषेंतील ***accent,*** इंग्रजीतील ***accent*** हून भिन्न आहे. हेल, झटका,

स्वरदर्शक आघात हे तीन प्रकार भिन्न आहेत ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत ह्या कालबोधक उच्चार पद्धतीहि वेगळ्या आहेत. ऱ्हस्व शब्दांनाहि उदात्त स्वर असूं शकतो आणि दीर्घ शब्दहि अनुदात्त असतो. ऱ्हस्व, दीर्घ आणि हेल, झटके या पलीकडे ‘स्वर’ म्हणून कांहीं स्वतंत्र वस्तू वैदिक भाषेंत आहे. वर्णमाला स्वतंत्र असून स्वरहि अगदी स्वतंत्र आहेत. असे स्वर वैदिक भाषेंतच कां? हा संशोधनाचा विषय आहे.

आप्पा ठोंबरे.

दिनांक:२२/५/२००५.